**१०१ ते २५० हे.सिं.क्ष. प्रकल्पांच्या सर्वेक्षण कामांसाठी निधीचे वितरण: जि. अमरावती.**
**(विदर्भ विभाग)**

**महाराष्ट्र शासन**
मृद व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्र.सर्वेक्ष-२०२४/प्र.क्र.३२२/जल-४
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५.

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४, १२ फेब्रुवारी, २०२५ व १७ मार्च, २०२५.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती कार्यालयाचे पत्र जा.क्र. /असंलि/**१५३४**/२०२४, दिनांक १३ मार्च, २०२४.
३) शासन ज्ञापन समक्रमांक दिनांक ३१ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :** १०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघुसिंचन (जलसंधारण) प्रकल्पांच्या सर्वेक्षणाकरिता मागणी क्र.झेडएच-३, लेखाशीर्ष २७०२ ९२१९ खाली सन २०२४-२५ मध्ये रुपये २५.०० कोटी निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. त्यापैकी वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकांनुसार सद्या उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून संदर्भीय दिनांक १३/०३/२०२४ च्या प्रस्तावामधील सर्वेक्षण कामांचा शिल्लक निधी देण्याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**निर्णय : अमरावती** जिल्ह्यातील संदर्भीय क्र. २ येथील प्रस्तावांमधील पात्र व परिपुर्ण सर्वेक्षण कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी **एकूण रुपये ३६.३१ लक्ष (अक्षरी रुपये छत्तीस लक्ष एकतीस हजार फक्त) एव्हढी** रक्कम वितरित करण्यासाठी याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. वरील निधी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरित करण्यात येत आहे :

अ) सर्वेक्षण कामांच्या मान्यता, कार्यारंभ आदेश, सर्व्हेक्षण अहवाल, नकाशे, क्षेत्र कार्यवृत्त इ. कागदपत्रे उपलब्ध असल्याची व सर्व कामे नियमानुसार झालेली असल्याची खातरजमा करावी,

ब) अन्वेक्षणासंदर्भातील आवश्यक बाबी (Trial Pit / Core Logging Report) यांची पूर्तता झाली असल्याची देखील खातरजमा करुन घेण्यात यावी,

क) मोजमाप पुस्तिकेतील नोंदी तपासून मागणी केलेली रक्कम वाजवी असल्याची तसेच संबधित कामांना दुबार निधीचे वितरण होत नसल्याची खातरजमा करुन घेण्यात यावी,

ड) मंजूर किंमतीपेक्षा जास्तीची रक्कम वितरित करण्यात येवू नयेत,

ई) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर अखर्चित रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी,

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. यावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र.झेडएच-३,
२७०२, लहान पाटबंधारे
८०, सर्वसाधारण
००५, अन्वेक्षण
(०१) सर्वेक्षण
(०१) (०२) १०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेपर्यंतच्या पाटबंधारे योजनांचे सर्वेक्षण (कार्यक्रम) (२७०२ ९२१९)
२७, लहान बांधकामे

५. उपरोक्त खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतीस्वाक्षरीत प्रती विहित मार्गाने शासनास सादर कराव्यात.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांची राहिल व अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, नागपूर हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेले हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आहेत. त्यांचा संकेताक २०२५०३२८१२१०३१४४२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.28 12:11:06 +05'30'

(रा. हे. बागडे)
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

**प्रति,**

१) अप्पर आयुक्त, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, नागपूर.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती.
३) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती.
४) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
६) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती / जल-४.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. विरोधीपक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित ल.सिं.(जसं) उपविभागिय अभियंता)
५. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, मृद व जलसंधारण, छ. संभाजीनगर.